**शासकीय तसेच अनुदानित महाविद्यालयातील व्यावसायिक अभ्यासक्रमात शिकणा-या आर्थिकदृष्ट्या मागास घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांची आर्थिक मर्यादा वाढविण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक इबीसी २००८/(२३३/०८)/तांशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

संदर्भ : १) शालेय शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्रमांक इबीसी १०९२/१२२१/ साशि-५, दिनांक ३० मार्च, १९९३.
२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. १५/अर्थसं/ ईबीसी/शा-अशा/२००८-०९/४१३, दिनांक ३१ मार्च, २००९.

**प्रस्तावना** : तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय तसेच शासन अनुदानित महाविद्यालयातील व्यावसायिक अभ्यासक्रमात शिकणा-या आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांची वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये १५,०००/- वरुन रुपये १,००,०००/- पर्यंत वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यापूर्वी संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक ३० मार्च, १९९३ अन्वये आर्थिक दुर्बल घटकासाठी फी सवलतीसाठी वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये १५,०००/- एवढी विहित करण्यात आली होती. सदरहू मर्यादा सुमारे १७ वर्षापूर्वी विहित केलेली असल्यामुळे दरम्यानच्या कालावधीत झालेली किंमतीतील वाढ, इत्यादी बाबी लक्षात घेऊन तसेच व्यावसायिक शिक्षणाचा लाभ जास्तीत जास्त आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना प्राप्त व्हावा, या सामाजिक बांधीलकीपोटी सदरहू वार्षिक उत्पन्नाची मर्यादा प्रति वर्षी रुपये १५,०००/- वरुन रुपये १,००,०००/- एवढी वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याचप्रमाणे शासनाने व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या खाजगी विना अनुदानित शैक्षणिक संस्थांमध्ये शिकणा-या आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांच्या वार्षिक आर्थिक उत्पन्नाची मर्यादा यापूर्वीच रुपये १ लक्ष केलेली आहे. म्हणून त्या धर्तीवर शासकीय तसेच शासन अनुदानित संस्थांमध्ये शिकणा-या आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांची उत्पन्नाची मर्यादा वाढविणे शासकीय धोरणात समानता असावी, या दृष्टीने आवश्यक ठरले. आता या संदर्भात त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** : तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या शासकीय तसेच शासन अनुदानित संस्थांमधील पदविका, पदवी व पदव्युत्तर पदवींमध्ये शिकणा-या आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांची वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये १५,०००/- वरुन रुपये १,००,०००/- एवढा वाढविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**(कृपया मागे पहा.)**

२.     सदरहू योजनेचा लाभ खालील व्यावसायिक अभ्यासक्रमांकरिता देय राहील.

अ) पदविका अभ्यासक्रम : अभियांत्रिकी
औषधनिर्माणशास्त्र
वास्तुशास्त्र
हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी

ब) पदवी अभ्यासक्रम : अभियांत्रिकी
औषधनिर्माणशास्त्र
वास्तुशास्त्र
हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी

क) पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम : एमबीए/एमएमएस
एमसीए

३.     या योजनेचा लाभ शैक्षणिक वर्ष २००९-१० मध्ये वरील अभ्यासक्रमात शिकणा-या व या पुढेही शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांसाठी देय ठरेल.

४.     सदरहू आर्थिक उत्पन्नाची मर्यादा ही शासन पुढील आदेश होईपर्यंत कायम राहील.

५.     या योजनेचा लाभ मिळण्यासाठी विद्यार्थ्याने संबंधित तहसीलदारांचे उत्पन्नाचे प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१००३०२१७१९१२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपालांचे आदेशानुसार व नावाने,

(कांतीलाल उमाप)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक (तंत्रशिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (उच्च शिक्षण), उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (कृषि), कृषि संचालनालय, महाराष्ट्र राज्य.
संचालक (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती/तांशि-४